राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेकरिता Single Nodal Agency व Nodal Officer ची नियुक्ती करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः राग्रास्व २०२१/प्र.क्र. ५८ /आस्था-१५
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट,
मुंबई- ४०० ००१.
दिनांक : २९ सप्टेंबर, २०२१.

वाचा -

१) शासन निर्णय, ग्राम विकास विभाग, क्रमांक राग्रास्व २०१८/प्र.क्र.१०२(भाग-२)/आस्था १५, दिनांक २०.०२.२०१९.
२) केंद्रीय ग्रामीण विकास विभाग, मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. F.No.G२००११/१४/२०२०/RL(E-३७३२२३), दिनांक ०३.०५.२०२१.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक संकीर्ण २०२१/प्र.क्र.३५/कोषा प्रशा-४,दि. १.०७.२०२१

प्रस्तावना :

केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे प्रभावी व्यवस्थापन करण्याच्या तसेच निधी विनियोगाच्या प्रक्रीयेत परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाने त्यांचे दिनांक २३ .०३.२०२१ च्या ज्ञापनान्वये दिनांक ०१.०७.२०२१ पासून सुधारित कार्यपध्दतीचा अवलंब करण्याचे निर्देश दिलेले आहेत . या अनुषंगाने वित्त विभागाने संदर्भ क्रमांक ३ च्या परिपत्रकान्वये केंद्र शासनाच्या सुधारित कार्यपध्दतीनुसार प्रत्येक केंद्र पुरस्कृत योजनेच्या अंमलबजावणीसाठी Single Nodal Agency ची नेमणूक करावी व त्यासोबतच योजनेच्या समन्वयाच्या दृष्टीने उप सचिव दर्जाच्या अधिकाऱ्याची Nodal Officer म्हणून नियुक्ती करावी, असे निदेश दिलेले आहेत.

राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान ही केंद्र पुरस्कृत योजना आहे . सदर योजनेची अंमलबजावणी सन २०१८-१९ पासून संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्यात करण्यात आली आहे . या योजनेमध्ये निधीचे प्रमाण केंद्र हिस्सा ६०% व राज्य हिस्सा ४०% असे आहे. राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियानांतर्गत राबविण्यात येणाऱ्या सर्व उपक्रमांसाठी राज्य व्यवस्थापन कक्ष , राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान ( SPMU-RGSA) यांची State Nodal Agency व राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान यांना Nodal Officer म्हणून नियुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियानांतर्गत राबविण्यात येणाऱ्या सर्व उपक्रमांसाठी राज्य व्यवस्थापन कक्ष, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान ( SPMU-RGSA) या कार्यालयाची State Nodal Agency व राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान यांची Nodal Officer म्हणून नियुक्ती करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२११००१२११३००२३३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL SURYAKANT HANJE

Digitally signed by SUNIL SURYAKANT HANJE
DN: cn=SUNIL SURYAKANT HANJE, o=Rural Development Department, ou=Rural Development Department, email=sunil.hanje@nic.in, c=IN
Date: 2021.10.01 15:00:36 +05'30'

(सुनिल हंजे)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. सचिव, ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षण) महाराष्ट्र,१/२ मुंबई/नागपूर.
३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र,१/२ मुंबई/नागपूर.
३. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)
४. जिल्हाधिकारी ( मुंबई व मुंबई उपनगर वगळून ), (सर्व )
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ( सर्व )
६. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
७. राज्य प्रकल्प संचालक, राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान, पुणे.
८. संचालक राज्य ग्रामीण विकास संस्था (यशदा), बाणेर रोड, पुणे
९. उप सचिव, ग्राम विकास विभाग, (सर्व)
१०. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. वित्त विभाग, (व्यय-१५/अर्थसंकल्प-१७/कोषा-प्रशा-४) मंत्रालय, मुंबई ३२.
१२. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१३. निवड नस्ती का.क्र. आस्था-१५, ग्राम विकास विभाग.